**सन २००४-०५ मध्ये एकवेळचे विशेष केंद्रीय सहाय्यातून शासकीय आश्रमशाळा तलाई, ता. धडगांव व होराफळी, ता. अक्कलकुवा, जि. नंदूरबार या आश्रमशाळांच्या बांधकामासाठी वाढीव निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक- शाआशा-२००८/प्र.क्र.५९/का.१३
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १८ जुलै, २००९

**वाचा :-** १) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-अकेंस-२००६/प्र.क्र.२८/का.१४१४, दिनांक ३० नोव्हेंबर, २००६.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र-अकेंस-२००७/प्र.क्र.३९/१४१४, दिनांक २५ नोव्हेंबर २००८.
३) आदिवासी विकास विभाग, पत्र क्रमांक-शाआशा-२००८/प्र.क्र.५९/का.१३, दिनांक १८ जून, २००९.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, शहादा यांचे पत्र क्रमांक-लेशा/२२२२/२००९ दि. ३१-३-२००९.

**शासन निर्णय :-** आदिवासी विकास विभागाच्या शासकीय आश्रमशाळांच्या बांधकामासाठी केंद्र शासनाकडून एकवेळचे विशेष केंद्रीय सहाय्यातून धडगांव व अक्कलकुवा विशेष कृती कार्यक्रमातर्गत रोषमाळ, सोनखुर्द, तलाई, सरी, भगदरी, बर्डी, वडफळी, होराफळी या आठ शासकीय आश्रमशाळांच्या बांधकामासाठी रु. ६००.०० लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला आहे. सदर आश्रमशाळांपैकी शासकीय आश्रमशाळा तलाई, ता. धडगांव व होराफळी, ता. अक्कलकुवा, जि. नंदूरबार या आश्रमशाळांच्या बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी दिनांक ३१-३-२००९ च्या पत्रान्वये केली होती.

शासकीय आश्रमशाळा रोषमाळ ता. धडगांव व सोनखुर्द ता. अक्कलकुवा या आश्रमशाळांच्या बांधकामासाठी अनुक्रमे रु. १०६.०५ लक्ष व रु. ७५.०० लक्ष असा एकूण रु. १८१.०५ लक्ष इतका निधी वाटप करण्यात आला आहे. तथापि सदर शाळेच्या बांधकामासाठी जमिन अद्याप प्राप्त झालेली नाही. त्यामुळे या दोन आश्रमशाळांच्या रु. १८१.०५ लक्ष इतक्या वाटप केलेल्या निधीपैकी शासकीय आश्रमशाळा तलाईसाठी रु. २४.६६ लक्ष व शासकीय आश्रमशाळा होराफळीसाठी रु. ५७.९५ लक्ष असा एकूण ८२.६१ लक्ष इतका निधी वळता करण्यासाठी नियोजन विभागाच्या सहमतीने शासन मंजूरी देत आहे.

ROTA / 17 1999 (300-7-09) 1 (क्र. मा.५.

F:\BACKUP\D\2008\Constructions Files 2008 C.R. 59.2003

यावर होणारा खर्च नियोजन विभागाच्या लेखाशीर्ष -४५१५-८०० (०२) (०१) केंद्र शासनाकडून मिळणा-या एकरकमी केंद्रीय सहाय्यामधून घ्यावयाच्या योजना ( योजनांतर्गत) नंदूरबार जिल्हयातील धडगांव आणि अक्कलकुवा तालुक्यातील विशेष कृति कार्यक्रमासाठी अनुदान (४५१५-००५-७) याखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५८/१४८४ दिनांक ३०-४-२००९ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०७१८१८४७३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( गी . मो. चांदे )
कक्ष अधिकारी

प्रत,

प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक (५प्रती )
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन अधिकारी
अपर आयुक्त, आदिवासी विकास (प्रत्येकी २ प्रती) ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
उप सचिव ( इमारती-२) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२ महाराष्ट्र मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा ) १/२ महाराष्ट्र मुंबई/नागपूर
सर्व कोषागार अधिकारी चंद्रपूर/गडचिरोली/भंडारा/अहमदनगर
अवर सचिव (व्यय-१४) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प १७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव/कक्ष अधिकारी ( १,६,७,११,१२,१३ ) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.

- - - -